दहशतवाद विरोधी पथक, गु.नों.क्र.७/२०१४ मधून उदभवणा-या न्यायालयीन प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.विद्या कासले यांना व्यायसायिक फी मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एसपीपी -२०१४/प्र.क्र. ३३५/पोल-१०

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, ३० वा मजला,
कफ परेड, मुंबई-४०० ००५,
दिनांक : १५ जानेवारी, २०१५.

**संदर्भ :-** शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र. एसपीपी-१०१४/ ए.एस.९५/डी-चौदा, दिनांक २१.१०.२०१४

**शासन निर्णय :-** दहशतवाद विरोधी पथक पो.ठा.स्था.गु.र.क्र.७/२०१४ या गुन्हयातून उद्बभवणा-या न्यायालयीन प्रकरणी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड.विद्या कासले यांची विधी व न्याय विभागाच्या दिनांक २१.१०.२०१४ च्या अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आली आहे.

२. प्रस्तुत खटल्यासाठी ॲड. विद्या कासले यांना प्रतिदिनी परिणामकारक सुनावणी फी रुपये १०,०००/- या प्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, प्रस्तुत प्रकरणी त्यांना अपरिणामकारक सुनावणी फी, किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही.

३. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उप आयुक्त दर्जाहून कमी नाही अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०१, गुन्हा अन्वेषण व दक्षता (००) (०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) - २८ व्यावसायिक सेवा या

लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७७/१४/व्यय-७, दिनांक १९.११.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे..

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०८१३२७०४९८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: CN = Arun Vishnupant Joshi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.01.15 11:02:39 +05'30'

(अ.वि.जोशी)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विधी व न्याय विभाग (का-१४),मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८. ॲड.श्रीमती विद्या कासले, डी.एम.मंझिल कॉंग्रेस हाऊस, व्हि.पी.रोड, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).